**खेड नगरपरिषद, जिल्हा रत्नागिरी येथील खांब तलावाच्या पर्यावरण संवर्धनासाठी नगरपरिषदेकडून राबवण्यात येणा-या प्रकल्पातील कामांच्या खर्चास प्रशासकीय मान्यता व निधी मुक्त करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रासयो-२०१५/प्र.क्र.०१/तां.क.३**
नवीन प्रशासन भवन,१५वा मजला,हुतात्मा राजगुरू चैाक,
मादाम कामा मार्ग, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २७ मार्च, २०१५.

**वाचा -**

१.मुख्याधिकारी,खेड नगरपरिषद यांचे पत्र क्रमांकः जा.क्र.२२९६/२०१४-१५, दिनांक: १३ जानेवारी, २०१५.

२. पर्यावरण विभागाचे पत्र क्रमांकः रासयो-२०१५/ प्र.क्र.९७/ता.क.३, दिनांक: ०९ फेब्रुवारी, २०१५.

**प्रस्तावना :-**

राज्यातील तलाव, सरोवरे व मोठे जलाशय यांचे पर्यावरणीयदृष्ट्या संवर्धन करण्यासाठी राज्य शासनाने राज्य सरोवर संवर्धन योजना सन २००६-०७ या वर्षापासून सुरू केली आहे.या योजनेंतर्गत सर्वसाधारणपणे खालील मुख्य कामांचा समावेश होतो.

१.तलावाच्या पाण्याचे प्रदूषण करणारे स्त्रोत निश्चित करून प्रदुषण रोखण्यासाठी उपाययोजना करणे.

२. तलावात साचलेला अनावश्यक घातक व ऑरगॅनीक गाळ काढणे.

३.तलावाची गुणवत्ता टिकविण्याकरीता,

अ) तलावातील अनावश्यक व उपद्रवी वनस्पती नष्ट करून त्यांची वाढ नियंत्रणात आणण्यासाठी उपायोजना करणे.

ब) तलावांतर्गत जैविक प्रक्रीयेव्दारे तलावातील पाण्याची गुणवत्ता सुधारणे.

क) किनारा सौदर्यीकरण, हरीत पट्टा विकसीत करणे, कुंपण घालणे, मनोरंजनासाठी बालोद्यान, नौकाविहार, कमी किमतीची स्वच्छतागृहे इत्यादी.

४. जनसहभाग व जनजागृतीसाठी कार्यक्रम तसेच प्रदूषण रोखण्यासाठी स्थानिक परीस्थितीनुसार करावयाच्या उपाययोजना.

या योजनेतंर्गत सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात खेड नगरपरिषदेमार्फत सादर खांब तलावाचा प्रस्ताव मंजूर करण्याचे शासन विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

राज्य योजनेखाली राज्य सरोवर संवर्धन योजनेअंतर्गत खेड नगरपरिषदेमार्फत सादर खांब तलावाच्या पर्यावरणीयदृष्टया संवर्धनासाठी सविस्तर प्रकल्प अहवालानुसार सोबत जोडलेल्या "प्रपत्र - अ" मध्ये नमूद केलेली कामे पूर्ण करण्यासाठी एकूण रू. ६,८१,८६,११४/- ( अक्षरी रूपये सहा कोटी एक्क्याऐंशी लाख शहाऐंशी हजार एकशे चौदा फक्त) इतक्या रकमेस खालील अटी व सोबत जोडलेल्या "प्रपत्र -ब" मधील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. सदर मंजुर एकूण रकमेपैकी ९०% हिस्सा म्हणून राज्य शासन व १०% हिस्सा म्हणून खेड नगरपरिषद निधी उपलब्ध करून देईल. सदर योजनेची वित्तीय आकृतीबंध पुढील प्रमाणे राहील:-

| अ. क्र | हिस्सा | मंजुर निधी (रू) | अक्षरी मंजुर निधी |
|---|---|---|---|
| १ | **९०% राज्य हिस्सा** ( Storm Water Management या कामांसाठी राज्य शासनाकडून ६०% अंतर्भुत) | ५,७२,४१,४८७/- | **रूपये पाच कोटी बाहत्तर लाख एकेचाळीस हजार चारशे सत्याऐंशी फक्त.** |
| २ | **१०% खेड नगरपरिषदेचा हिस्सा** ( Storm Water Management या कामांसाठी स्थानिक संस्थेचा ४०% अंतर्भुत) | १,०९,४४,६२७/- | **रूपये एक कोटी नऊ लाख चव्वेचाळीस हजार सहाशे सत्तावीस फक्त.** |
| | **एकूण** | ६,८१,८६,११४/- | **रूपये सहा कोटी एक्क्याऐंशी लाख शहाऐंशी हजार एकशे चौदा फक्त** |

अ ) Storm Water Management या कामांसाठी राज्य शासनाकडून ६०% निधी प्राप्त होईल. उर्वरित ४०% निधी खेड नगरपरिषदेने खर्च करावयाचा आहे.

ब ) तलाव व तलाव परिसरात सध्या अस्तित्वात असलेली परिसंस्था, वन्यजीव अधिवास, पक्ष्यांचे खाद्य पुरवठा क्षेत्र, तलावाकाठावरील विशिष्ट वनस्पती, तेथील पक्ष्यांची निवारा स्थाने इ. बाबींना तलाव संवर्धनाच्या कामादरम्यान हानी पोहचणार नाही याची काळजी घेण्यात यावी व या अनुषंगाने वेळोवेळी पर्यावरणविषयक तज्ञ व्यक्तीकडून मार्गदर्शन घेण्यात यावे. तलावाच्या एकूण क्षेत्राच्या अनुषंगाने तलावातील गाळांचा उपसा (Dredging) उन्हाळ्यात करण्यात यावा. तसेच तलाव क्षेत्रातील घनकचरा व्यवस्थापनासाठी जागोजागी पुरेश्या कचरा पेटी (Dustbin) उपलब्ध करून देण्यात यावा.

क ) “प्रपत्र -अ” मधील नमूद कामांना प्रथमत: तांत्रिक मंजुरी प्राप्त करून घेण्यात यावी. योजनेच्या प्रत्येक टप्प्यात हाती घेण्यात येणा-या कामाचे मंजूर तांत्रिक आराखडे, अंदाजपत्रके, नकाशे, संकल्पचित्र इ. शासनाकडे काम सुरू करण्यापूर्वी सादर करणे बंधनकारक असेल. शासनास उपरोक्त माहिती सादर केल्यानंतरच कामे सुरू करण्यात यावीत. हाती घेण्यात यावयाच्या (“प्रपत्र-अ" मधील नमूद कामे) कामांसंबंधित तलावाच्या सद्यस्थितीची छायाचित्रे घेण्यात यावी, तसेच व्हीडीओ रेकॉर्डिंग करण्यात यावे. कामांच्या प्रगतीनुसार दर दोन महिन्यांनी याप्रकारे छायाचित्रण करण्यात यावे. योजनेतील कामे व त्यासाठीचा खर्च याबाबत मासिक आढावा घेऊन त्यानुसार बदल करण्याचे अधिकार शासनाकडे राहतील.

२. राज्य सरोवर संवर्धन योजनेंतर्गत खेड नगरपरिषद हद्दीतील खांब तलावाचे पर्यावरणीयदृष्ट्या संवर्धन करण्यासाठी राज्य हिश्श्यापोटी देय एकूण **५,७२,४१,४८७/-** (रूपये पाच कोटी बाहत्तर लाख एकेचाळीस हजार चारशे सत्याऐंशी फक्त.) पैकी पहिला हप्ता म्हणून रू.१००.०० लाख ( रूपये एक कोटी फक्त ) एवढी रक्कम मुख्याधिकारी, खेड नगरपरिषद यांना वितरीत / मुक्त करण्यास शासन निर्णयातील “प्रपत्र-ब" मधील सर्व मार्गदर्शक तत्वे, अटी व शर्तीच्या तसेच संदर्भाधीन दि.०९ फेब्रुवारी,२०१५ च्या पत्रासोबतच्या सुकाणू समितीच्या बैठकीच्या इतिवृतातील निर्णयाच्या अधीन राहून या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

३. या साठी मुख्याधिकारी,खेड नगरपरिषद (Chief Officer, Khed Municipal Council) यांचे नांवे रू.१०० लाख (रूपये एक कोटी फक्त) एवढ्या रकमेचा धनादेश काढण्यात यावा.

४. खेड नगरपरिषदेस अदा करावयाची रू.१०० लाख एवढी रक्कम अधिदान व लेखाधिकारी यांच्यामार्फत कोषागारातून काढून मुख्याधिकारी, खेड नगरपरिषद यांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्री. र.ल.लखोटे, कार्यासन अधिकारी, पर्यावरण विभाग व नियंत्रक अधिकारी म्हणून श्री. सो.ना. बागुल, उपसचिव, पर्यावरण विभाग, मंत्रालय यांना घोषीत करण्यात येत आहे. त्यांनी

मुख्याधिकारी, खेड नगरपरिषद यांना रू.१०० लाख (रूपये एक कोटी फक्त) अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई येथून स्वतंत्र धनादेशाद्वारे वितरित करण्याची कार्यवाही करावी.

५. सदर प्रयोजनार्थ होणारा खर्च "मागणी क्र.यु-४, ३४३५-परिस्थितिकी व पर्यावरण, ०४, प्रदूषण प्रतिबंध व नियंत्रण,१०३, वायू व जल प्रदूषण प्रतिबंध, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना, (०२)(०७) राष्ट्रीय सरोवर संवर्धन योजना (३४३५ ०१८२), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)" या मुख्य लेखाशिर्षाखाली सन २०१४-१५ वर्षात अर्थसंकल्पीत रू.६८३.४० लाख च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व त्याच लेखाशिर्षाखाली वर्गीकृत करण्यात यावा.

६. हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या व वित्त विभागाच्या सहमतीने आणि वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक: १६९/१५/व्यय-१६, दिनांक २७ मार्च, २०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४०६१२१२४६०९०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra Laxmikant Lakhote

Digitally signed by Ravindra Laxmikant Lakhote
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=421202, st=Maharashtra, cn=Ravindra Laxmikant Lakhote
Date: 2015.04.06 12:22:50 +05'30'

(र.ल.लखोटे)

**कार्यासन अधिकारी**

**प्रत,**

१. जिल्हाधिकारी, जिल्हा रत्नागिरी.
२. मुख्याधिकारी, खेड नगर परिषद, खेड, जिल्हा रत्नागिरी.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा),महाराष्ट्र १/२,मंबई/ नागपूर.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मंबई.
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
६. मा.मंत्री, पर्यावरण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
७. मा.राज्यमंत्री, पर्यावरण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
८. प्रधान सचिव, पर्यावरण विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मंबई.

९. प्रधान सचिव, नगरविकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मंबई.

१०.वित्त विभाग (कार्यासन क्रमांक व्यय-१६/अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई.

११.नियोजन विभाग, कार्यासन क्र.१४७२, मंत्रालय, मंबई.

१२.रोखशाखा, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई.

१३.निवडनस्ती.

शासन निर्णय क्रमांकः रासयो-२०१५/प्र.क्र.०१/तां.क.३, दि. २७ मार्च,२०१५ सोबतचे सहपत्र.

"प्रपत्र-अ"

## Conservation of Khamb Lake at Khed, Ratnagiri

| Sr.No | Item | Estimated Cost in Rupees |
|---|---|---|
| 1 | Aeration Treatment Mechanism and control arrangement | 2,12,43,514 |
| 2 | De-silting | 1,07,32,670 |
| 3 | Storm Water Management (60% State 40% Khed NagarParishad) | 1,37,53,384 |
| 4 | Silt Traps | 6,45,056 |
| 5 | Retaining wall construction /Repair | 43,58,876 |
| 6 | Shaping / strengthening of bund (including stone pitching /revetment) | 35,43,791 |
| 7 | Garden & Landscaping | 85,50,000 |
| 8 | Public Awareness & Participation | 2,00,000 |
| 9 | Water quality monitoring | 1,08,000 |
| | **SUB TOTAL** | **6,31,35,291** |
| | **Centages (@8%)** | **50,50,823** |
| | **Grand Total** | **6,81,86,114** |
| | **Rupees Six Crore Eighty One Lakh Eighty Six Thousand One Hundred Fourteen Only.** | |
| | **90% State Share** (Including Storm Water Management 60 percentage) | **5,72,41,487** |
| | **10% Municipal Council share** (Including Storm Water Management 40 percentage) | **1,09,44,627** |

Ravindra Laxmikant Lakhote

Digitally signed by Ravindra Laxmikant Lakhote
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=421202, st=Maharashtra, cn=Ravindra Laxmikant Lakhote
Date: 2015.04.06 12:23:16 +05'30'

(र.ल.लखोटे)

कार्यासन अधिकारी

## शासन निर्णय क्रमांक: रासयो-२०१५/प्र.क्र.०१/तां.क.३ दि. २७ मार्च, २०१५ सोबतचे सहपत्र

## "प्रपत्र-ब"

## राज्य सरोवर संवर्धन योजनेतंर्गत खेड नगरपरिषद हद्दीतील खांब तलावाच्या संवर्धन कामांसाठीच्या अटी व शर्ती

१. तलाव संवर्धन क्षेत्रात तज्ञ व कामाचा अनुभव असलेली तसेच “प्रपत्र अ”नुसार मंजूर खर्चाच्या बाबी संबधीत तज्ञ व पुरेसे तांत्रिक मनुष्यबळ असलेली संस्था / शासकीय प्राधिकरण / मंडळ यांची प्रथमत: प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार संस्था म्हणून मुख्याधिकारी, खेड नगरपरिषदने विहीत पध्दतीने नियुक्ती करावी. ही संस्था "प्रपत्र-अ" नुसार मंजूर खर्चाच्या बाबींचे स्थानिक डी.एस.आर.प्रमाणे खर्चाचे अंदाज, कामाचे आराखडे तयार करणे व तपासणे कामाची गुणवत्ता राखणे, सर्व कामे विहीत कालमर्यादेत पुर्ण करणे याबाबत वेळोवेळी समन्वय करेल. नगरपरिषदेने प्रकल्पासाठी तांत्रिक मनुष्यबळ तयार होण्यासाठी या संस्थेचा उपयोग करावा.

२.तलाव संवर्धन क्षेत्रात तज्ञ व कामाचा अनुभव असलेली तसेच “प्रपत्र अ”नुसार मंजूर खर्चाच्या बाबी संबधीत तज्ञ व पुरेसे तांत्रिक मनुष्यबळ असलेली संस्था / शासकीय प्राधिकरण / मंडळ यांची प्रथमत: प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार संस्था म्हणून मुख्याधिकारी, खेड नगरपरिषदने विहीत पध्दतीने नियुक्ती करावी. ही संस्था "प्रपत्र-अ" नुसार मंजूर खर्चाच्या बाबींचे स्थानिक डी.एस.आर.प्रमाणे खर्चाचे अंदाज, कामाचे आराखडे तयार करणे व तपासणे कामाची गुणवत्ता राखणे, सर्व कामे विहीत कालमर्यादेत पुर्ण करणे याबाबत वेळोवेळी समन्वय करेल. नगरपरिषदेने प्रकल्पासाठी तांत्रिक मनुष्यबळ तयार होण्यासाठी या संस्थेचा उपयोग करावा.

३.शासनाने वितरीत केलेल्या निधी च्या विहित प्रमाणात नगरपरिषदेने त्याचा अनुज्ञेय हिस्सा प्रकल्पावर खर्च केल्याशिवाय तसेच, प्रकल्पांतर्गत होणा-या कामांचे निरी व त्यासारखा नामवंत त्र्यस्थ संस्थेकडून गुणवत्ता लेखापरिक्षण केल्याशिवाय पुढील हप्ता मुक्त करण्यात येणार नाही.

४. कामे विहीत कालावधीत पूर्ण करण्याची व कामाची गुणवत्ता राखण्याची संपूर्ण जबाबदारी ही मुख्याधिकारी, खेड नगरपरिषद यांची असेल. सदर प्रकल्पाच्या कामासाठी लागणारा निधी खर्च करताना मुख्याधिकारी, खेड नगरपरिषद यांच्या देखरेखीखाली करण्यात यावा.

५. प्रकल्पाची यथायोग्य अंमलबजावणी होण्याच्या दृष्टीकोनातून प्रकल्प अंमलबजावणी समितीची मुख्याधिकारी, खेड नगरपरिषद यांच्या अध्यक्षतेखाली स्थापना करण्यात यावी. या समितीत नगरपरिषदेतील संबधित अधिकारी, कर्मचारी, पर्यावरण विषयक तज्ञ, उपरोक्त प्रकल्प व्यवस्थापन

सल्लागार संस्थेचे प्रतिनिधी यांच्यासह नगरपरिषदेस आवश्यक वाटतील अशा प्रतिनिधींचा समावेश करण्यात यावा. ही समिती प्रकल्पांतर्गत होत असलेल्या सर्व कामकाजाचे सनियंत्रण करेल व कामांच्या गुणवत्तेंवर नियंत्रण ठेवेल. सदर समितीची आढावा बैठक दर महिन्याला आयोजित करण्यात यावी.

६. प्रकल्प पूर्ण झाल्यावरही प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार संस्थेच्या मदतीशिवाय तलावाचे संवर्धन होणे गरजेचे असल्याने योजनेची कामे पूर्ण झाल्यावरही ही समिती बैठका आयोजित करेल. ही समिती भौतिक बाबींची देखभाल, प्रकल्पांपासून मिळणारे उत्पन्न, प्रकल्प संवर्धनासाठी उपाययोजना व खर्च याबाबत आढावा घेत राहील.

७. काम पूर्ण झाल्यावर किमान पुढील १० वर्षांपर्यंत तलावाची देखभाल व दुरूस्ती नगरपरिषदेने स्वखर्चाने करावयाची आहे. तसेच नगरपरिषद प्रकल्प अंमलबजावणी समितीचा अहवाल प्रत्येक ६ महिन्यांनी शासनाकडे पाठविण्याची व्यवस्था करेल.

८. तलावाच्या पाण्याची गुणवत्ता चालू महिन्यापासून पुढे प्रत्येक महिन्याला तपासण्यात यावी. पाण्याची गुणवत्ता तपासण्यासाठी या क्षेत्रातील तज्ञ प्रयोगशाळेची / संस्थेची / मंडळाची नियुक्ती करण्यात यावी. दर महिन्याचा पाण्याच्या गुणवत्तेचा अहवाल सदर संस्था प्रकल्प सनियंत्रण समितीस व पर्यावरण विभागास दर तीन महिन्यानी सादर करेल..

८. उपरोक्त मुद्यानुसार केलेल्या कार्यवाही प्रमाणे मुख्याधिकारी, खेड नगरपरिषद हे शासनास दर तीन महिन्याला खालील अहवाल सादर करतील:-

अ) मंजूर कामांचा भौतिक प्रगती अहवाल

ब) पाण्याच्या गुणवत्ता अहवालाच्या प्रती

क) प्रकल्प सनियंत्रण समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.

ड) खर्चाचे प्रत्येक तिमाहीचे उपयोगिता प्रमाणपत्र

९.सदर अहवाल सादर केल्याशिवाय कामाच्या पुढील टप्प्यातील निधी उपलब्ध करून देण्यात येणार नाही. तसेच आर्थिक वर्षाचे उपयोगिता प्रमाणपत्र वर्ष संपल्यानंतर एप्रिलच्या १० तारखेपर्यंत पर्यावरण विभागास सादर करावे. उपरोक्त मंजूर योजनेसाठी निधी उपलब्धतेनुसार अनुदान मुक्त करण्यात येईल.

१०.योजनेतंर्गत मंजूर विशिष्ट कामासाठी अदा केलेली वा मान्य केलेली रक्कम त्याच कामासाठी राज्य शासनाने घालून दिलेल्या अटी व शर्ती प्रमाणे व विहीत कालमर्यादेत मान्य केलेल्या खर्चाच्या मर्यादेत खर्च करणे आवश्यक आहे. हा निधी इतर दुस-या कोणत्याही कामासाठी वा नगरपरिषदेच्या कामासाठी

वापरता येणार नाही किंवा वळता करता येणार नाही. विशिष्ट कामासाठी मान्य केलेल्या खर्चापेक्षा जास्त खर्च झाल्यास त्याची जबाबदारी संबधित मुख्याधिकारी व नगरपरिषदेची असेल.

**११. या योजनेतंर्गत प्राप्त होणारा निधी हा राष्ट्रीयीकृत बॅकेत स्वतंत्र खाते उघडून त्या अंतर्गत जमा करावा व बॅकेत ठेवलेल्या निधीवर मिळणारे व्याज याच निधीत जमा करावे. या निधीच्या उपयोगितेवर नियंत्रण राहण्यासाठी खात्याचे संचालन मुख्याधिकारी, खेड नगरपरिषद यांच्याद्वारे करण्यात यावे. उपयोगिता प्रमाणपत्र सादर करतेवेळी बँकेतील या खात्यावर झालेल्या व्यवहाराच्या नोंदी दर्शविणा-या पासबुकाची साक्षांकित प्रत सोबत जोडण्यात यावी.**

१२.योजना पूर्ण झाल्यावर या योजनेंतर्गत निर्माण झालेल्या मालमत्तेपासून किंवा सोयीसुविधांपासून मिळणारे उत्पन्न हे या योजनेसाठी उघडलेल्या स्वतंत्र बँक खात्यातच जमा करण्यात यावे. या उत्पन्नातून तलाव संवर्धनासाठी अतिरिक्त कामे राज्य शासनाच्या पर्यावरण विभागाच्या अनुमतीने हाती घेता येतील. मात्र तलावाच्या संवर्धनाच्या कामाव्यतिरिक्त इतर कोणत्याही कामासाठी हा महसूली निधी वापरता येणार नाही.

१३.ही कामे शासन आदेशाच्या दिनांकापासून /धनादेशाच्या दिनांकापासून २४ महिन्यात किंवा तत्पूर्वी पूर्ण करावयाची आहेत.

१४. मंजूर बाबीतील खर्चामध्ये बचत झाल्यास बचत झालेला निधी योजनेतीलच दुस-या उपांगासाठी राज्य शासनाच्या पर्यावरण विभागाच्या परवानगीने वापरता येईल

१५.राज्य सरोवर संवर्धन योजनेतंर्गत निर्माण केलेल्या यंत्रणेच्या देखभाल व दुरूस्तीचा खर्च योजना कार्यान्वित झाल्यानंतर संबंधीत नगरपरिषदेने स्वत:च्या निधीतून भागवावयाचा आहे.

१६.योजनेतंर्गत खर्च करण्यात येणा-या रकमेचे लेखे प्रचलित लेखा संहितेनुसारच ठेवण्यात यावेत व त्याचे लेखापरीक्षण स्थानिक निधी व लेखापाल यांच्याद्वारे करण्यात यावे व त्याचा अहवाल पर्यावरण विभागास पाठविण्यात यावा.तसेच प्रत्येक आर्थिक वर्षा अखेर झालेल्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र संबंधित महालेखापाल कार्यालयास पाठविण्याचा जबाबदारी नगरपरिषदेची राहिल.

१७.तलावाच्या कामांच्या प्रगतीच्या अहवालाची तसेच खर्चाच्या विवरणपत्राची पर्यावरण विभागाच्या सक्षम अधिका-याकडून तपासणी करण्यात येईल व तपासणीच्या वेळी नगरपरिषदेने आवश्यक ती सर्व कागदपत्रे उपलब्ध करून देणे बंधनकारक असेल.

१८.संबंधीत नगरपरिषदेच्या हद्दीतील हॉटेलमधून / लोकवस्तीतून / वाणिज्यिक आस्थापनेतून निघणारे सांडपाणी तलावात जाणार नाही याची जबाबदारी संबंधीत नगरपरिषदेवर असेल

१९.योजनेवरील कामासाठी मान्यता प्राप्त झालेल्या रक्कमेपेक्षा अधिक खर्च झालेली रक्कम शासनाकडून उपलब्ध होणार नाही. या कामासाठी शासनाने अदा केलेली रक्कम जर त्या कामावर घालून दिलेल्या विविक्षित वेळेमध्ये खर्च होऊ शकत नसेल तर त्यास राज्य शासनाच्या पर्यावरण विभागाची पूर्वपरवानगी घेणे आवश्यक असेल.

२०.योजनेवरील कामासाठी अदा केलेली रक्कम योग्यरितीने वापरली जात नाही किंवा कामाची योग्य ती प्रगती होत नाही असे शासनाच्या निदर्शनास आल्यास शासन कोणत्याही क्षणी अशा कामांची प्रशासकीय मान्यता रद्दबातल करू शकेल

२१.राज्य शासनाच्या पर्यावरण विभागाच्या परवानगी शिवाय तलावात बोटींगची सुविधा उपलब्ध करून देण्यात येणार नाही. तसेच यांत्रिक बोटींचा वापर तलावात कुठल्याही प्रयोजनासाठी अनुज्ञेय असणार नाही. फक्त पॅडल बोटचा वापर अनुज्ञेय असेल.

२२.तलावात मत्स्यमारी शक्यतो करण्यात येवू नये. मत्स्यमारी करावयाची झाल्यास फक्त मार्च, एप्रिल व मे या तीन महिन्यासाठी परवानगी देण्यात यावी. अशावेळी १० इंच व त्यापेक्षा लहान आकाराच्या माशांना पकडण्याची मुभा देण्यात येवू नये. स्थानिक परिस्थितीनुसार याबाबत प्रकल्प सनियंत्रण समिती वेळोवेळी निर्णय घेईल

२३.योजनेवरील कामांसाठी राज्य शासनाच्या अनुदाना व्यतिरीक्त शासनाकडून, वित्तीय संस्थाकडून वा आणखी कोणत्याही संस्थाकडून प्राप्त निधी या योजने अंतर्गत खर्च झाल्याचे दर्शविण्यात येवू नये. (No Overlapping of schemes)

२४.योजनेचे समन्वयन व पर्यवेक्षण करण्यासाठी भेट देणा-या राज्य शासनाच्या अधिका-यांस आवश्यक त्या सर्व प्रशासकीय सुविधा उपलब्ध करून देणे आवश्यक असेल

२५.योजनेतंर्गत शासनाच्या अनुदानातून तयार केलेली मालमत्ता, ज्या कामासाठी निर्माण केली आहे. त्याच कामासाठी वापरणे आवश्यक आहे व त्यासाठी ही मालमत्ता अभिलेखित करणे आवश्यक आहे

२६.योजनेतंर्गत करण्यात येणा-या निरनिराळया कामांचे व समन्वयाचे काम राज्यस्तरावरील संनियंत्रण समितीव्दारे करण्यात येते. या समितीने कामाबाबत वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करणे आवश्यक असेल.

२७.योजनेतंर्गत नगरपरिषदेच्या होणा-या आस्थापनेवरील व लागणा-या मनुष्यबळावरील खर्च संबंधीत नगरपरिषदेद्वारे करण्यात येईल. त्यासाठी या विभागाकडून अनुदान देण्यात येणार नाही.

२८.योजनेतंर्गत तलावातून काढण्यात येणा-या गाळाचे अभिलेख व छायाचित्रासह पुरावे नगरपरिषदेने जतन करावेत. तसेच गाळाच्या विल्हेवाटीची अभिलेखामध्ये नोंद करून ठेवावी.

२९.तलाव संवर्धनाबाबत मंजूर कामांमध्ये तलावातील गाळ काढणे व सिल्ट ट्रॅप लावण्याच्या कामाचा समावेश असल्यास, तलावाच्या गाळ काढण्याच्या कामाबरोबरच तसेच पावसाळ्यापूर्वी सिल्ट ट्रॅप लावण्याचे काम पूर्ण होणे आवश्यक आहे. अन्यथा तलावात पुन्हा गाळ जमा होऊ शकतो

३०.तलावाच्या कामास सुरूवात करण्यापूर्वीची छायाचित्रे विभागास सादर करावीत.

३१.राज्य शासनाने वेळोवेळी घालून दिलेल्या अटींचे व शर्तींचे पालन करणे नगरपरिषदेवर बंधनकारक राहील.

३२.योजनेतंर्गत किती लोकांना रोजगार उपलब्ध झाला याची नोंद ठेवावी.

३३.योजना कालमर्यादेत पूर्ण करणे बंधनकारक असल्याने योजने करीता कोणतेही एस्कलेशन चार्जेस अनुज्ञेय नाहीत.

३४.योजनेतर्गत मंजूर कामांच्या निविदा हया प्रकल्पातंर्गत मंजूर किंमतीपेक्षा जास्त किंमतीच्या स्विकारण्यात येऊ नयेत.

३५.कॉन्ट्रॅक्टरने विहीत वेळेत काम पूर्ण न केल्यास त्यांच्यावर दंड आकारण्याची तरतूद ठेवण्यात यावी.

३६.योजनेतंर्गत झालेल्या सर्व खर्चाचा ताळमेळ वेळोवेळी अधिदान व लेखाअधिकारी कार्यालय, मुंबई व तसेच महालेखाकार कार्यालय, मुंबई /नागपूर यांच्या कार्यालयाशी घालण्याची जबाबदारी संबधीत नगरपरिषदेची असेल.

३७.योजना पूर्ण झाल्यावर भविष्यात तलावाच्या उपयोगाबाबत व वापराबाबत किंवा तलावासंदर्भात कोणतीही नविन कामे हाती घ्यावयाची झाल्यास त्यास प्रथम राज्य शासनाच्या पर्यावरण विभागाची मान्यता घेण्यात यावी.

Ravindra Laxmikant Lakhote

Digitally signed by Ravindra Laxmikant Lakhote
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=421202, st=Maharashtra, cn=Ravindra Laxmikant Lakhote
Date: 2015.04.06 12:23:38 +05'30'

**( र.ल.लखोटे )**

**कार्यासन अधिकारी**